**पोलीस अधिकारी/कर्मचारी यांना साप्ताहिक सुट्टीच्या मोबदल्यात देण्यात येणाऱ्या दैनिक भत्याच्या दरात वाढ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीएए ०३१८/सीआर-४०/पोल-५अ,**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२, दिनांक २० जुलै, २००४.**

<u>**वाचा :**</u> १) शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीएए ०३९८/सीआर-१८/पोल-५अ,दि.६ जून,१९९२
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीएए ०३९२/सीआर-१८/पोल-५अ,दि.२४.२.१९९९
३) पोलीस महासंचालकांचे क्र. पोमसं/३०/९०७८/२००४, दि.७.१.२००४ चे पत्र.
४) शासन पत्र क्र.बीजीटी १००४/नवीन बाब/२००४-२००५/बीयुडी-१, दि. २.७.२००४.
५) शासन पत्र क्र.बीजीटी १००४/२०५५/२००४-२००५/बीयुडी-१, दि. ८.७.२००४

**शासन निर्णय :-** पोलीस विभागातील पोलीस निरीक्षक या हुद्यापर्यंतचे पोलीस अधिकारी व पोलीस कर्मचारी यांना साप्ताहिक सुट्टीच्या मोबदल्यात देण्यात येणाऱ्या दैनिक भत्त्याच्या दरामध्ये त्यांच्या वेतन मर्यादेनुसार खालीलप्रमाणे वाढ करण्यास शासन मंजूरी देत आहे.

| वेतनमर्यादा ( असुधारीत) | दैनिक भत्ता (रुपये) |
|---|---|
| रु. २८००-३५०० | रुपये १०५/- |
| रु.१९००-२७९९ | रुपये ९०/- |
| रु. १४००-१८९९ | रुपये ८०/- |
| रु.१४०० पेक्षा कमी | रुपये ६८/- |

२. सदरचा दैनिक भत्ता ज्या अधिकारी/कर्मचारी यांनी साप्ताहिक सुट्टीच्या दिवशी कर्तव्य बजाविलेले आहे त्यांनाच देण्यात यावा. त्यासाठी संबंधित पोलीस ठाण्यात/घटक कार्यालयात नोंदवही ठेवण्यात यावी व त्यामध्ये ज्या कामासाठी अधिकारी/कर्मचारी सुट्टीच्या दिवशी कर्तव्यावर आले होते त्याची नोंद घेण्यात यावी. ही नोंदवही आवश्यक तेव्हा तपासणीसाठी उपलब्ध करून देण्यात यावी. हा दैनिक भत्ता सरसकट दिला जाणार नाही याची जबाबदारी यथास्थित संबंधित पोलीस ठाणे प्रमुख/कार्यालय प्रमुख इत्यादींची राहील.

३. हे सुधारीत दर दिनांक १.४.२००४ पासून अंमलात येतील. याकरीता येणारा खर्च "२०५५-पोलीस १०८ राज्य मुख्यालय पोलीस (०२) शहर पोलीस (०२) (०१) आस्थापना ","२०५५-पोलीस १०९ जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २००४-२००५ या आर्थिक वर्षात अतिरिक्त अर्थसंकल्पासह मंजूर करण्यास आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर ३१०/०४/व्यय-७ दिनांक १७/५/२००४ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शि.शं. धुमाळे )
सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
संचालक, लाचलुचपत प्रतिबंधक केंद्र व विशेष पोलीस महानिरीक्षक, मुंबई
सर्व पोलीस उपमहानिरीक्षक, सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस अधिक्षक (लोहमार्गासहित)
सर्व समादेशक राज्य राखीव पोलीस बल
महालेखापाल/(लेखापरिक्षा)/मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग व्यय-७, मंत्रालय, मुंबई-३२,
उ.स. बीपुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.